लेखाशीर्ष “४४०२, मृद व जलसंधारण
यावरील भांडवली खर्च ”

# महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
## शासन निर्णय क्रमांकः बीयूडी-२०१६/ प्र. क्र. ४५१/ पापु-१५

सातवा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल,
क्रॉफर्ड मार्केटजवळ , लोकमान्य टिळक मार्ग, नवी मंत्रालय,मुंबई- ४०० ००१
तारीख: १५ नोव्हेंबर, २०१६

**वाचा -**

**शासन ज्ञापन,पा.पु.व.स्व. वि.क्रमांकः ज्ञापन क्र.आपना-२०१२/प्र.क्र.१०१/पापु-१५ दि.२७.९.२०१६**

**प्रस्तावना -**

सन २०१५-१६ च्या अर्थसंकल्पात ४४०२ ११४८ या मुख्य लेखाशीर्षांतर्गत ०२ मजुरी, या उप शीर्षाखाली रु. ३.०० लक्ष, ०५२ यंत्रसामग्री व साधनसामग्री या उप शिर्षाखाली रु. ९०.०० लक्ष इतकी तरतूद भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणेस मंजूर करण्यात आली आहे.

मा. उच्च न्यायालय मुंबई , खंडपीठ औरंगाबाद येथे दाखल रिट याचिका क्र.८०६५/२०१३ मधील आदेशास अनुसरुन याचिकाकर्ते श्री. रंगनाथ नाना पटारे, श्री. सुभाष पवार आणि श्री. हरीदास पवार यांना नुकसान भरपाई व नुकसान भरपाई रक्कमांवर मा. उच्च न्यायालयाच्या निर्णयाच्या दिनांकापासून चार महिन्यांनंतरच्या कालावधीसाठी म्हणजेच दिनांक ३०.१०.२०१५ पासून ते दिनांक २७.९.२०१६ पर्यंतच्या कालावधीवर ८% दराने व्याज अदा करण्यास शासन मान्यता प्राप्त झाली असुन याबाबतचे शासन ज्ञापन दि.२७.९.२०१६ रोजी निर्गमित करण्यात आले आहे. सदर वाढीव खर्चासाठी आवश्यक असलेला निधी पुनर्वितरणाने उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय-

सन २०१६-१७ च्या पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या अर्थसंकल्पातील उपलब्ध तरतुदींपैकी मागणी क्र. वाय-६, मुख्य लेखाशीर्ष ४४०२, मृद व जलसंधारणावरील भांडवली खर्च, ४४०२ ११४८ या लेखाशिर्षाखालील ०५२ यंत्र सामग्री व साधन सामग्री या उद्दिष्टामध्ये होणारी बचत विचारात घेऊन रु. ५.०० लक्ष इतका निधी याच लेखाशिर्षाखालील ०२ मजुरी या उद्दिष्टाखालील वाढीव खर्चासाठी पुनर्वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

संबंधित अधिकाऱ्यांनी पुनर्वितरणानंतरच्या सुधारित तरतुदींची नोंद घेऊन सदर निधीच्या वितरणाबाबतची पुढील कार्यवाही करावी.

सदर शासन निर्णय, वित्त विभाग शासन निर्णय दि. १७.०४.२०१५, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग पहिला, उपविभाग तीन, अ. क्र. ३ परिच्छेद क्र. १६६ मधील तरतुदींनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१११५१५००५६७४२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Mahesh Bhagwan Sawant

Digitally signed by Mahesh Bhagwan Sawant
DN: CN = Mahesh Bhagwan Sawant, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation Department
Date: 2016.11.15 16:37:30 +05'30'

**( महेश सावंत )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे
२. उप संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा (सर्व)
३. वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा (सर्व)
४. उप अभियंता ( यां ), भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा (सर्व)
५. महालेखापाल, महाराष्ट्र -१ मुंबई / २ - नागपूर ( लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता )
६. वित्त विभाग ( व्यय - ३), मंत्रालय, मुंबई
७. कक्ष अधिकारी / लेखा अधिकारी, पापु-०१, पापु-०४, पापु-२०
८. निवड नस्ती (पापु-१५)